GR-20040803162612001-1201

<u>पंचायत समिति संगणकीकरण.</u>

**महाराष्ट्र शासन.**

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक संगणक २००२/प्र.क्र. ०६/सं.कक्ष,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- [illegible], २००२.**

वाचा :- शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक अविआ २००२/प्र.क्र. २२/२४ अ, दिनांक ३० मार्च, २००२.

<u>प्रस्तावना</u> :-

११ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांच्या बळकटीकरणासाठी केंद्र शासनाकडून सन २००० - २००५ या पांच वर्षांच्या कालावधीसाठी प्रतिवर्षी रुपये १३१.३५ कोटी प्रमाणे निधी राज्याला मिळणे अपेक्षित आहे. वर नमूद केलेल्या दिनांक ३० मार्च, २००२ च्या शासन निर्णयान्वये सन २००१-२००२ या वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या निधीपैकी रुपये ५.०० कोटी इतका निधी राज्यातील पंचायत समित्यांच्या संगणकीकरणासाठी राखीव ठेवलेला आहे. सदर निधी उपरोक्त दिनांक ३० मार्च, २००२ च्या शासन निर्णयान्वये सर्व जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यांत आलेला आहे. राज्यातील पंचायत समित्यांच्या संख्या विचारात घेऊन जिल्हानिहाय निधीचे वाटप करण्यांत आले आहे. सदर निधीचा विनियोग पुढीलप्रमाणे करण्यांत यावा.

<u>शासन निर्णय</u> :- राज्यातील ३४९ पंचायत समित्यांची संख्या विचारात घेता पंचायत समित्यांच्या संगणकीकरणासाठी राखीव ठेवलेल्या रुपये ५.०० कोटी इतक्या निधीपैकी प्रत्येक पंचायत समितीस रुपये १,४३,२६६/- इतका निधी येतो. शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान विभागाने संगणक व इतर साधनसामुग्रीच्या खरेदीसाठी दिनांक १३ मार्च, २००२ रोजी दरकरार केलेला आहे. सदर दरकरार दिनांक ३१ मे, २००२ पर्यंत लागू आहे. सदर दरकरारातील किंमती विचारात घेऊन <u>प्रत्येक</u> पंचायत समितीसाठी रुपये १,४३,२६६/-

त्या अनुषंगाने दरकरारात नमूद केल्याप्रमाणे दिनांक ३१ मे, २००२ पूर्वीच वरील तक्त्यात नमूद केलेल्या साधनसामुग्रीची खरेदी करण्यांत यावी.

४) संगणक व तद्अनुषंगीक साधनसामुग्री खरेदी केल्यावर खरेदी केलेल्या साहित्याचा व खर्चाचा तपशिल शासनास पाठविण्यांत यावा.

५) खरेदी करावयाच्या संगणकाची वितरणपुर्व चाचणी एन.आय.सी.च्या जिल्हा शाखेकडून करुन घ्यावी.

सदर शासन निर्णय माहिती तंत्रज्ञान विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६४९, दिनांक १९/४/२००२ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( मं. मं. शिंदे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर,
सचिव,माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई- ३२
सर्व उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
संचालक, एन.आय.सी.मंत्रालय,मुंबई-३२
संचालक,माहिती तंत्रज्ञान संचालनालय,मंत्रालय,मुंबई-३२
सर्व विभागीय आयुक्त,
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन. नवी मुंबई,
सर्व उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (वरिष्ठ).
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व जिल्हा माहिती अधिकारी,एन.आय.सी.(NIC)
नियोजन विभाग, का.क्र.
वित्त विभाग (व्यय १५ / अर्थोपाय).
कार्यासन क्र. २८, २९ व ४० ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
का.क्र. २४ अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
निवड नस्ती, संगणक कक्ष.